**कनिष्ठ अभियंत्यांच्या व्यावसायिक परीक्षेच्या कार्यपध्दती व नियमामध्ये सुधारणा करण्याबाबत-**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : परीक्षा-१०२३/प्र.क्र.१५/आस्था-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २६ एप्रिल, २०२३.

वाचा : महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका १९८४, परिशिष्ट १ उपविभाग-३ *" कनिष्ठ अभियंत्यांच्या व्यवसाय परीक्षेच्या संबंधातील कार्यपध्दती व नियम "*

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक बांधकाम नियमावली, १९८४ मध्ये नमूद भाग-एक व भाग-दोन नुसार आयोजित होणाऱ्या परीक्षेतील गट-अ व गट-क संवर्गातील अधिकाऱ्यांना विहीत केलेले गुण प्राप्त झाले असल्यास, पुढील प्रयत्नात सदर विषय उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्याबाबत तरतूद आहे. परंतु कनिष्ठ अभियंता (गट-ब) संवर्गातील परीक्षार्थींना अशा प्रकारची सूट मिळण्याची तरतूद उक्त नियमातील उपविभाग-तीन मध्ये नसल्याने, परीक्षेत एखाद्या विषयात अनुत्तीर्ण झाल्यास उमेदवारास पुढील संधीदरम्यान सर्व विषयांची परीक्षा पुन्हा देणे क्रमप्राप्त ठरते. त्यामुळे उप विभाग-तीन नुसार आयोजित होणाऱ्या परीक्षेसाठी देखील सूट देण्याबाबत नियम असावेत, अशी मागणी विविध संघटनांमार्फत करण्यात येत आहे. राज्यातून मोठया संख्येने कनिष्ठ अभियंता संवर्गातील परीक्षार्थी असतात. गट-अ व गट-क प्रमाणे सूट न मिळाल्याने अनुत्तीर्ण परीक्षार्थींना सर्व विषयांसह पुन्हा परीक्षेस बसावे लागते. त्यामुळे परीक्षार्थींना विहित संधीमध्ये परीक्षा उत्तीर्ण होणे कठीण होते. तसेच परीक्षा पुन्हा घेण्याकरीता शासनास अतिरिक्त आर्थिक भार येतो. यास्तव सदर नियमांमध्ये सुधारणा करण्याची विनंती अधीक्षक अभियंता व सहसंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक यांनी जलसंपदा विभागास केली आहे. तसेच, जलसंपदा विभागाने सूट देण्याकरीता नमूद नियमांमध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. नमूद वस्तुस्थिती विचारात घेता, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका १९८४, परिशिष्ट १ उपविभाग-३ "कनिष्ठ अभियंत्यांच्या व्यवसाय परीक्षेच्या संबंधातील कार्यपध्दती व नियम" मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

<u>**शासन निर्णय**</u> :

महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका १९८४, परिशिष्ट १ उपविभाग-३ "***कनिष्ठ अभियंत्यांच्या व्यवसाय परीक्षेच्या संबंधातील कार्यपध्दती व नियम***" मधील नियम १३ अंतर्गत पुढीलप्रमाणे तरतूद समाविष्ट करण्यात येत आहे :-

**" जो उमेदवार फक्त एका विषयात अनुत्तीर्ण झाला असेल पण त्याने अन्य सर्व विषयांच्या एकूण गुणांपैकी किमान ५५ % गुण मिळविले असतील तर तो ज्या विषयात अनुत्तीर्ण झाला असेल फक्त त्या विषयाची परीक्षा देऊ शकेल. "**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०४२६१७२९१५८६१८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, pseudonym=CFE26382E86B5A65A15535D568FBA76EABCA944E, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2023.04.26 17:37:08 +05'30'

**(द.व.खारके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
३) अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) संचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
५) सर्व मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता/कनिष्ठ अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
६) अधीक्षक अभियंता तथा सहव्यवस्थापकीय संचालक, मेटा, नाशिक.
७) मा.मंत्री,सार्वजनिक बांधकाम विभाग (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव.
८) अ.मु.स. (सा.बां.वि.) यांचे स्वीय सहायक.
९) सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक.
१०) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
११) सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहायक.
१२) कक्ष अधिकारी, आस्था-१/आस्था-३, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) कक्ष अधिकारी, आ(प्रशि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) कार्यासन (आस्था-२)निवडनस्ती.